राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (RUSA)
या योजनेअंतर्गत रुसा संचालनालयास
निधी उपलब्ध करुन देण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: रूसायो - २०१८/प्र.क्र.३४३/विशि-३,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: २१ नोहेंबर, २०१९.

**वाचा :-**

(१) शासन परिपत्रक वित्त विभाग, अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ८ जुलै, २०१९
(२) मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.२४-३७/२०१४-U.Policy (MHEQSAC-Gen,SC,ST), दि. १५/०७/२०१९.
(३) राज्य प्रकल्प सहसंचालक (प्र), राष्ट्रीय उच्चत्तर शिक्षा अभियान (रुसा), मुंबई यांचे पत्र क्र. राप्रसं/रुसा/२०१९-२०/३५८, दि. २५/०७/२०१९.
(४) उपसंचालक (वित्त), राष्ट्रीय उच्चत्तर शिक्षा अभियान (रुसा), मुंबई यांचे पत्र क्र.राप्रसं/रुसा/२०१९-२०/४९३, दि.३०.०९.२०१९
(५) उपसंचालक (वित्त), राष्ट्रीय उच्चत्तर शिक्षा अभियान (रुसा), मुंबई यांचे पत्र क्र.राप्रसं/रुसा/२०१९-२०/५२५, दि.१४.१०.२०१९

**प्रस्तावना :-**

राज्यामध्ये प्राथमिक शिक्षणाचे सबलीकरण करण्यासाठी राबविण्यात आलेल्या सर्व शिक्षा अभियान व राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियानाच्या यशस्वीतेमुळे उच्च शिक्षणाची गुणवत्ता व पाया यांचे सबलीकरण करण्यासाठी एकछत्री योजना, अभियान स्वरुपात राबविण्याकरिता केंद्र शासनाने राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (RUSA) ही योजना, १२ व्या व १३ व्या पंचवार्षिक योजनांमध्ये राबविण्याचे ठरविले आहे. महाराष्ट्र राज्यात उच्च शिक्षणात गुणवत्ता, सर्वदूर संधी, समानता यासाठी केंद्र शासनाने तयार केलेल्या राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियानाच्या अंमलबजावणीबाबत दि.२१.०४.२०१५ रोजी मंत्रीमंडळाच्या बैठकीत निर्णय घेण्यात आलेला आहे.

राज्य मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने ही योजना राज्यात प्रभावीपणे राबविण्यासाठी राज्य प्रकल्प संचालनालयाची स्थापना करण्यात आलेली आहे. या योजने अंतर्गत अकृषी विद्यापीठे व शासकीय संस्था यांना अनुदान वितरीत करण्याचे केंद्र व राज्याचे प्रमाण ६०:४० असे ठरविण्यात आलेले आहे.

राज्य प्रकल्प संचालनालयासाठी केंद्र शासनाकडून संदर्भीय क्र.२ येथील दि.१५.०७.२०१९ रोजीच्या पत्रान्वये Enhancing Quality and Excellecnce in Selected Autonomous Colleges या घटकांतर्गत १४ स्वायत्त महाविद्यालयांना रुसा २.० अंतर्गत पहिला हप्त्यापोटी केंद्र हिस्सा (६०%) रु. २१,००,००,०००/-इतका निधी उपलब्ध करुन दिला आहे. केंद्र हिश्श्याच्या प्रमाणात राज्य हिस्सा (४०%) रु.१४,००,००,०००/- असा एकूण रु.३५,००,००,०००/- (रुपये पस्तीस कोटी फक्त) इतका निधी राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय

उच्चतर शिक्षा अभियान (रुसा), मुंबई यांना उपलब्ध करुन वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियानाअंतर्गत मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांनी खालील तक्त्यामध्ये नमूद केल्याप्रमाणे Enhancing Quality and Excellecnce in Selected Autonomous Colleges या घटकांतर्गत **केंद्र हिस्सा (६०%) रु. २१,००,००,०००/- च्या प्रमाणात राज्य हिस्सा (४०%) रु. १४,००,००,०००/- असा एकूण रु. ३५,००,००,०००/- (रुपये पस्तीस कोटी फक्त)** इतका निधी राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (रुसा), मुंबई यांना उपलब्ध करुन वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | महाविद्यालयाचे नाव | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०%) | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | कर्मवीर भाऊराव पाटील महाविद्यालय, वाशी | १,५०,००,०००/- | १,००,००,०००/- | २,५०,००,०००/- |
| २ | डॉ. भानुबेन महेंद्र नानावटी गृह विज्ञान शास्त्र महाविद्यालय, मुंबई | १,५०,००,०००/- | १,००,००,०००/- | २,५०,००,०००/- |
| ३ | गुरुनानक खालसा कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, मुंबई | १,५०,००,०००/- | १,००,००,०००/- | २,५०,००,०००/- |
| ४ | चंगु काना ठाकूर कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, पनवेल | १,५०,००,०००/- | १,००,००,०००/- | २,५०,००,०००/- |
| ५ | हंसराज जीवनदास शिक्षण महाविद्यालय, मुंबई | १,५०,००,०००/- | १,००,००,०००/- | २,५०,००,०००/- |
| ६ | छत्रपती शिवाजी महाविद्यालय, सातारा | १,५०,००,०००/- | १,००,००,०००/- | २,५०,००,०००/- |
| ७ | सर परशुरामभाऊ महाविद्यालय, पुणे | १,५०,००,०००/- | १,००,००,०००/- | २,५०,००,०००/- |
| ८ | तुळजाराम चतुरचंद कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, बारामती | १,५०,००,०००/- | १,००,००,०००/- | २,५०,००,०००/- |
| ९ | सदगुरु गाडगे महाराज महाविद्यालय, कराड | १,५०,००,०००/- | १,००,००,०००/- | २,५०,००,०००/- |
| १० | कर्मवीर भाऊराव पाटील महाविद्यालय, पंढरपूर | १,५०,००,०००/- | १,००,००,०००/- | २,५०,००,०००/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ११ | सर सिताराम व श्रीम.शांताबाई पाटकर कला व विज्ञान महाविद्यालय आणि व्ही.पी.वरदे वाणिज्य व अर्थशास्त्र महाविद्यालय, मुंबई | १,५०,००,०००/- | १,००,००,०००/- | २,५०,००,०००/- |
| १२ | आर.ए. पोदार वाणिज्य व अर्थशास्त्र महाविद्यालय, मुंबई | १,५०,००,०००/- | १,००,००,०००/- | २,५०,००,०००/- |
| १३ | निर्मला निकेतन सामाजिक कार्य महाविद्यालय, मुंबई | १,५०,००,०००/- | १,००,००,०००/- | २,५०,००,०००/- |
| १४ | प्रताप महाविद्यालय, अमळनेर, जळगाव | १,५०,००,०००/- | १,००,००,०००/- | २,५०,००,०००/- |
| **एकूण रुपये** | | **२१,००,००,०००/-** | **१४,००,००,०००/-** | **३५,००,००,०००/-** |

२. या संदर्भात झालेला खर्च सक्षम प्राधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्याच्या अटीच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशोब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता राज्य प्रकल्प संचालनालयाने सादर केली पाहिजेत.

३. राज्य प्रकल्प संचालनालयास केंद्र शासनाने ज्या प्रयोजनार्थ निधी मंजूर केलेला आहे त्या निधीचा वापर त्याच प्रयोजनासाठी करावा. खरेदी व बांधकामाची मान्यता विद्यापीठ/ महाविद्यालयाच्या सक्षम प्राधिकाऱ्यामार्फत घेण्यात यावी.

४. तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि. ०१/१२/२०१६ च्या शासन निर्णयातील तरतूदी व त्या सोबतच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे तसेच तद्नंतर वेळोवेळी देण्यात आलेल्या सूचनांनुसार सदरची खरेदी प्रक्रिया विद्यापीठांनी त्यांच्या स्तरावर पार पाडावी व विहित कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

५. सद्य:स्थितीत राज्य प्रकल्प संचालनालयासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून राज्य प्रकल्प संचालक, रुसा यांना व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून राज्य प्रकल्प सहसंचालक, रुसा यांना घोषित करण्यात आलेले आहे. त्यानुषंगाने आवश्यक ती कार्यवाही नियंत्रक अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी.

६. राज्य हिश्श्यावरील खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यू-२, प्रधानशीर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (०७) (०२) राष्ट्रीय

उच्चतर शिक्षा अभियानांतर्गत अशासकीय संस्थांना सहाय्यक अनुदान (४० टक्के राज्य हिस्सा) (२२०२ आय २७२), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली व केंद्र हिश्श्यावरील खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यू-२, प्रधानशीर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (०७) (०१) राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियानांतर्गत अशासकीय संस्थांना सहाय्यक अनुदान (६० टक्के केंद्र हिस्सा) (२२०२ आय २६३), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० मधील मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८ जुलै, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात सदर परिपत्रकासोबतच्या परिच्छेद ७ मधील व सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र. ९ येथील अटी व शर्तीची पूर्तता करण्यात आली आहे. तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २७०/ अर्थोपाय, दि. २९ जुलै, २०१९ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९११२११४५३१४९००८ आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Jagdeorao Tidke

Digitally signed by Satish Jagdeorao Tidke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=abbed596652773468508d937a99472988ebdda28db8c543b79abe527c99646f6, cn=Satish Jagdeorao Tidke
Date: 2019.11.21 14:59:25 +05'30'

**(सतिश तिडके)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल, (लेखा परीक्षण), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे.
७) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) नियोजन विभाग (कार्यासन १४७१), मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/कार्यासन अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
१०) मा. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
११) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२) कार्यासन अधिकारी (साशि १), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती (विशि-३)